**कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांकरीता सर्वसाधारण प्रवर्गाचा सन २०२०-२१ करीता ₹ २७६७.८९०५ लाख निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : असुअ-२०२०/प्र.क्र.३६/४अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : ०८ जुलै, २०२०

**संदर्भ:-**

१. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३१/१७-अे,दि.१९/०४/२०१७
२. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र FileNo.२-१/२०२०/ NFSM, दि.२९/०४/२०२०.
३. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.०४ मे.२०२०
४. कृषि आयुक्तालयाचे पत्र NFSM/Extn-१/AAP २०-२१/F.No.०१/२०/१२५२३, दि.०४/०५/२०२०.
५. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६ एप्रिल, २०२०
६. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.२-१६/२०२०-NFSM (FTS: ८३२७७), Dt.२०/०५/२०२०
७. कृषि आयुक्तालयाचे पत्रक्र./विप्र १/राअसुअ/वाकृआ/प्रक्र.१/प्र.मान्यता/२०/१३१४० , दि .२६/०५/२०२०
८. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. असुअ-२०२०/प्र.क्र.३२/४ अे, दि.२८ मे, २०२०
९. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.२०-२७/२०१७-NFSM (CA-V),.दि.०१/०६/२०२०
१०. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/वि.प्र.१/राअसुअ/निवि२०-२१/प्र.क्र.०९/१३६०५/२०२०, दि.०३/०६/२०२०

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या संदर्भांकित दि.२९/०४/२०२०रोजीच्या पत्रान्वये सन २०२०-२१ करीता या अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांकरिता राज्य शासनास मंजूर करण्यात आलेल्या नियतव्यय (Allocation) मर्यादेत एकूण ₹२३३८९.२२ लाख रकमेचा वार्षिक कृती आराखडा केंद्र शासनाच्या मंजूरीस्तव सादर केला होता. केंद्र शासनाने संदर्भांकित दि. २० मे, २०२०रोजीच्या पत्रान्वये ₹ २३३८९.२३० लाख इतक्या कृती आराखड्यास मंजूरी प्रदान केलेली आहे. कोविड-१९ च्या पार्श्वभूमिवर वित्त विभागाचे दि.०४ मे. २०२० वरील शासन निर्णयातील मुद्दा क्र.२ नुसार राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - अन्नधान्य पिकांकरीता रु.७९४०.५९ लाख (केंद्र हिस्सा रु.४७६४.३५४ लाख+राज्य हिस्सा रु.३१७६.२३४ लाख) रकमेच्या वार्षिक कृती आराखडयास दिनांक २८ मे, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे. .

सन २०२०-२१ करिता केंद्र शासनाने अभियानांतर्गत पहिल्या हप्त्यात केंद्र हिस्याचा ₹७०१६.७६ लाख निधी वितरीत केलेला असून त्याप्रमाणे कृषि आयुक्तालयाच्या मागणीप्रमाणे सर्वसाधारण प्रवर्गाकरिता केंद्र व राज्य हिस्स्याचा एकूण ₹५५३५.७८१ लाख (रुपये पंच्चावन कोटी पस्तीस लाख अठ्ठयात्तर हजार शंभर फक्त)

निधी वितरणाचा प्रस्ताव मान्यतेस्तव वित्त विभागास सादर केला होता. वित्त विभागाने सदर निधी वितरणाच्या ५० टक्के निधी वितरीत करण्याबाबतचे निदेश दिले आहेत. त्यानुसार सदर अभियानातंर्गत सर्वसाधारण प्रवर्गाकरिता केंद्र व राज्य हिस्स्याचा आवश्यक निधी वितरीत करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे-

**शासन निर्णयः**

१. सन २०२०-२१ करीता कृषी उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांकरीता **सर्वसाधारण प्रवर्गासाठी** केंद्र व राज्य हिस्स्याचा एकूण **₹२७६७.८९०५ लाख (रुपये सत्तावीस कोटी सदुसष्ट लाख एकोनव्वद हजार पाचशे फक्त) निधी** या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषी) पुणे, यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे पिक निहाय उपलब्ध करुन देण्यात येत आहे, सदर निधीपैकी केंद्र व राज्य हिस्साच्या वितरीत निधीचे विवरण पुढीलप्रमाणे -

**(रु.लाख)**

| अ. क्र. | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके | सर्वसाधारण प्रवर्ग | | एकूण वितरीत निधी |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | |
| १ | भात | ६९.३२ | ४६.२१२५ | ११५.५३२५ |
| २ | गहू | ४१.८८५५ | २७.९२४५ | ६९.८१ |
| ३ | कडधान्य | १२९५.८२२ | ८६३.८७९ | २१५९.७०१ |
| ४ | भरडधान्य (मका) | ४७.०४ | ३१.३६२ | ७८.४०२ |
| ५ | पौष्टिक तृणधान्य | २०६.६६६ | १३७.७७९ | ३४४.४४५ |
| **एकूण** | | **१६६०.७३३५** | **११०७.१५७** | **२७६७.८९०५** |

२. राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेला केंद्र हिस्स्याचा ₹१६६०.७३३५ लाख (रुपये सोळा कोटी साठ लाख सात हजार तीनशे पस्तीस फक्त निधी व राज्य हिस्स्याचा ₹११०७.१५७ लाख (रुपये अकरा कोटी सात लाख पंधरा हजार सातशे फक्त) निधी खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०२०-२१ करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

| केंद्र हिस्याचे लेखाशिर्ष | राज्य हिस्याचे लेखाशिर्ष |
|---|---|
| **मागणी क्रमांक डी-३**<br>**२४०१- पीक संवर्धन**<br>**(००) (१०२) अन्नधान्य पिके**<br>**(००) (२५) कृषी उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके**<br>**(केंद्र हिस्सा ६०%) (केंद्र पुरस्कृत योजना)**<br>**(२४०१ ४६१४)(योजनांतर्गत) (दत्तमत)**<br>**३३, अर्थसहाय्य** | **मागणी क्रमांक डी-३**<br>**२४०१- पीक संवर्धन**<br>**(००) (१०२) अन्नधान्य पिके**<br>**(००) (३३) कृषी उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके**<br>**(राज्य हिस्सा ४०% ) (केंद्र पुरस्कृत योजना)**<br>**(२४०१ A२३४) (योजनांतर्गत) (दत्तमत)**<br>**३३, अर्थसहाय्य** |

३. सन २०२०-२१ मध्ये राज्यात सदर अभियानाची अमंलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने निधी आहरण व वितरण करणेसाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संवितरण आधिकारी** |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि),<br>कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |
| २ | जिल्हा स्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |

४. शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाकरीता उपलब्ध करुन दिलेल्या एकूण ₹ २७६७.८९०५ लाख निधी संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी PFMS प्रणालीद्वारे जिल्हा निहाय वितरीत करावा.

५. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेल्या ₹ २७६७.८९०५ लाख निधीच्या आहरणाकरिता संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी आणि सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सन २०१९-२० मधील PFMS वरील शिल्लक निधी रु.१४७४.५८७ लाख (केंद्र हिस्सा रु.८८२.८०७ लाख + राज्य हिस्सा रु.५९१.७८० लाख) आहे. त्यापैकी सर्वसाधारण प्रवर्गाकरिता PFMS वरील शिल्लक निधी रु.३९४.२३६ लाख (केंद्र हिस्सा रु.२३६.५४२ लाख +राज्य हिस्सा रु.१५७.६९४ लाख) सन २०२०-२०२१ मध्ये विनियोग करण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना मान्यता देण्यास येत आहे.

७. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. सदर उपयोगिता प्रमाणपत्राच्या आधारे सचिव (कृषी) यांच्या स्वाक्षरीने सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास निर्गमित करण्यात येईल.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६ एप्रिल, २०२० नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १०१/ २०२०/व्यय-१, दि.२९/०६/२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००७०८१६४३१५५६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ZENDAGE MAHAVEER BALASAHEB

Digitally signed by ZENDAGE MAHAVEER BALASAHEB
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=a9503a5209c984c11d292912b642bdfd32282e4276fb5541f4f92f23cb110d23, postalCode=400032, street=MADAM CAMA ROAD,MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=43d7bb272129cd1382853268481cb2ceee1f236d393acecb71084bc36ffeed02, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
cn=ZENDAGE MAHAVEER BALASAHEB
Date: 2020.07.08 16:51:03 +05'30'

**( महावीर झेंडगे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा. मंत्री (कृषि)यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानसभा ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानपरिषद ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग ,मंत्रालय, मुंबई
८. सचिव (कृषि) ,कृषि व पदुम विभाग ,मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
११. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१२. सर्व विभागीय कृषी सहसंचालक
१३. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी
१४. महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१५. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१८. सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे
१९. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
२०. निवड नस्ती-४अे.